**शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता व्यवस्थापकीय अनुदानाची रक्कम मंजूर करण्याबाबत.**
**(लेखाशिर्ष - २४२५-१३५९ )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शविम-१११४/प्र.क्र.१३१/का.३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १५ मार्च, २०१७.

वाचा :-
१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.बीजीटी-२०१३/प्र.क्र.४३/अर्थसंकल्प-३, दि.२८/०३/२०१३.
२) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक यांचे पत्र क्र.:- शआविम/लेखा/व्य.अ./बजेट/५६४/२०१५, दि. ३१/०१/२०१७.

प्रस्तावना:-

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदानाकरिता रु. ७५०.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक यांनी संदर्भाधिन दि. ३१.०१.२०१७ च्या पत्रान्वये रु. २५०.०० लक्ष व्यवस्थापकीय अनुदान वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

त्यानुषंगाने शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-१७ करीता व्यवस्थापकीय अनुदानाकरिता रु. ७५०.०० लक्ष इतका निधी शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळासाठी अर्थसंकल्पित केलेला आहे. सदर अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या व्यवस्थापकीय अनुदानाच्या तरतूदीपैकी रु. २५०.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) तरतुद संगणक वितरण प्रणालीद्वारे वितरीत करुन खालील प्रमाणे खर्च करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | खर्चाचा तपशिल | रुपये (लक्ष) |
|---|---|---|
| १ | वेतन भते | १५०.०० |
| २ | प्रवास खर्च | ०२०.०० |
| ३ | कार्यालयीन खर्च | ०३०.०० |
| ४ | कायदेशिर शासन हमी फी व ऑडीट फी | ०५०.०० |
| | **एकुण** | **२५०.००** |

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी उपरोक्त रक्कम रु. २५०.०० लक्ष (अक्षरी रुपये दोन कोटी पन्नास लक्ष फक्त) एवढी रक्कम कोषागारातून काढून ती शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक यांना त्वरीत अदा करावी. महामंडळाने

केलेल्या खर्चाचा तपशील आयुक्तालयामार्फत शासनास सादर करावा. रक्कम ज्या बाबींकरिता मंजूर करण्यात आली आहे, त्याच बाबींवर खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

३. सदर खर्च "मागणी क्रमांक- टी-५, मुख्य लेखाशीर्ष-२४२५ सहकार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना-(०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना (०१)(१०) शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळास वित्तीय सहाय्य (२४२५ १३५९) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. तसेच शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेले सर्व वित्तीय नियम, बजेट व कोषागार नियमावली, शासन आदेश/ निर्णय व CVC ची मार्गदर्शक तत्त्वे, CAG चे निदेश इत्यादींचे अनुपालन करावे. त्याचप्रमाणे महालेखापालांचे आक्षेप येणार नाहीत याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१५१७२४४८३७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2017.03.15 17:26:23 +05'30'

(ल.गो. ढोके)
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) आयुक्त (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२) व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ मर्या., नाशिक.
३) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६) वित्त विभाग (साऊ/व्यय-१४/अर्थ-१९), मंत्रालय, मुंबई.
७) संचालक, लेखापरीक्षा, ऑफिस ऑफ दि डायरेक्टर, ऑडिट सायंटिफिक अॅन्ड कमर्शियल डिपार्टमेंट, १०१, महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२०.
८) कक्ष अधिकारी (कार्या-६) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
- पुढील कार्यवाही करावी.
९) निवडनस्ती, कार्यासन-३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.